**श्री.संग्राम लहु कानडे, नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-अ / राजपत्रित) यांना सार्वजनिक बांधकाम विभागाकडील सहायक अभियंता श्रेणी-२ व जलसंपदा विभागाकडील सहायक अभियंता श्रेणी-१ या पूर्वीच्या पदाची सेवा जोडून देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्र. नियुक्ती-११२०/प्र.क्र.१५/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, चौथा मजला, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ ऑक्टोबर, २०२०.

वाचा :-

(१) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.मलोआ-२०१०/प्र.क्र.५६/सेवा-३, दि.०८.०९.२०१०.
(२) जलसंपदा विभाग, शसन निर्णय क्र.नियुक्ती-१०१२/(६/२०१२)/आ.(संनि), दि.१३.०२.२०१२.
(३) नगर विकस विभाग, शासन निर्णय क्र.नियुक्ती-१११६/१९५७/प्र.क्र.३४३/२०१६/नवि-२७, दि.०३.०४.२०१७.
(४) संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण विभाग, मध्यवर्ती कार्यालये, पुणे यांचे पत्र जा.क्र.आस्था/संलकानडे/नगर रचनाकार/सेवाग्राह्य/प्रशा-१/२८३२, दि.१०.०६.२०१९.
(५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दि.२३.०३.१९९४.
(६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.आप्रयो-१०१२/प्र.क्र.७१/सेवा-३, दि.१९.०१.२०१३.

प्रस्तावना :-

श्री.संग्राम लहु कानडे यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-अ व गट-ब मध्ये करावयाच्या नेमणूकीसाठी सन २००७ मध्ये घेतलेल्या स्पर्धात्मक परिक्षेच्या निकालानुसार, आयोगाने त्यांच्या दिनांक ०८.०२.२०१० च्या पत्रान्वये केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भीय क्र.१ येथील दि.०८.०९.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) गट-ब (वेतनश्रेणी ९३००-३४८००+ ग्रेड पे ४४००) या पदावर नियुक्ती झाल्याने, सदर पदावर श्री.कानडे दिनांक १७.०९.२०१० (म.पू.) रोजी रुजू झाले होते.

२. तसेच, श्री.कानडे यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्यापूर्वीच, सरळसेवा भरतीसाठी घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धात्मक परिक्षेच्या निकालावर आधारित महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशी नुसार जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये सहायक अभियंता श्रेणी-१ पदावरील नियुक्तीसाठी शिफारस केलेल्या उमेदवारांपैकी ज्या उमेदवारानी नियुक्ती स्विकारलेली नाही त्यांच्याऐवजी प्रतिक्षा यादीतील उमेदवारांची शिफारस दोन्ही विभागानी आयोगाकडे विनंती केली होती. त्यानुषंगाने, आयोगाने दिनांक ३०.०५.२०११ व दिनांक ०२.०८.२०११ च्या पत्रान्वये केलेल्या शिफारशीच्या

अनुषंगाने, जलसंपदा विभागाच्या संदर्भीय क्र.२ येथील दि.१३.०२.२०१२ अन्वये सहायक अभियंता श्रेणी-१ (गट-अ) (वेतनश्रेणी १५६००-३९१००+ ग्रेड पे ५४००) या पदावर नियुक्ती झाल्याने, सार्वजनिक बांधकाम विभागाने दिनांक २९.०२.२०१२ रोजी कार्यमुक्त केल्यानंतर सहायक अभियंता श्रेणी-१ या पदावर श्री.कानडे दिनांक ०१.०३.२०१२ (म.पू.) रोजी रुजू झाले होते.

३. तद्नंतर, नगर विकास विभागाच्या संदर्भीय क्र.३ येथील दि.०३.०४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्री.संग्राम लहु कानडे यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील " नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-अ / राजपत्रित)" पदावर नियुक्ती करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन कार्यकारी अभियंता, उर्ध्व प्रवरा कालवा विभाग, संगमनेर यांनी श्री.संग्राम लहु कानडे यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता दि.१९.०४.२०१७ (म.नं.) रोजी कार्यमुक्त केले होते. त्यानुसार, श्री.कानडे हे शाखा कार्यालय, धुळे येथील नगर रचनाकार, श्रेणी-१ पदावर दि.२०.०४.२०१७ (म.पू.) रोजी रुजू झाले होते.

४. संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, पुणे यांच्या संदर्भीय क्र.४ येथील दिनांक १०.०६.२०१९ रोजीच्या पत्रान्वये श्री.संग्राम लहु कानडे, नगर रचनाकार यांचा पूर्वीच्या पदावरील सेवा नवीन पदावर ग्राह्य धरुन सुधारित वेतननिश्चिती तसेच पूर्वीच्या शासन सेवेतील सर्व लाभ मिळण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने, श्री.संग्राम लहु कानडे यांची पूर्वीच्या पदावरील सेवा नवीन पदावर ग्राह्य धरण्याबाबत व त्याअनुषंगाने, अनुज्ञेय लाभ मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**<u>शासन आदेश :-</u>**

श्री.संग्राम लहु कानडे, नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-अ / राजपत्रित) यांना सार्वजनिक बांधकाम विभागाकडील "सहायक अभियंता श्रेणी-२" या पदावर दि.१७.९.२०१० ते दि.२९.०२.२०१२ ची सेवा व जलसंपदा विभागातील "सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य)" या पदावर दि.०१.०३.२०१२ ते दि.१९.०४.२०१७ ची सेवा नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-अ / राजपत्रित) या सध्याच्या दि.२०.०४.२०१७ रोजी पासूनच्या सेवेस जोडून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री.संग्राम लहु कानडे, नगर रचनाकार यांची प्रथम नियुक्ती दि.०१.११.२००५ नंतरची असल्याने, त्यांना राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना (पूर्वीची नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना") लागू राहील.

३. श्री.कानडे, नगर रचनाकार यांची सार्वजनिक बांधकाम विभागाकडील "सहायक अभियंता श्रेणी-२" या पदावरील दि.१९.०७.२०१० ते दि.२९.०२.२०१२ या कालावधीतील वेतननिश्चितीबाबत वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दि.२३ मार्च, १९९४ व महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११(१)(ए) मधील तरतुदीनुसार व जलसंपदा विभागाकडील "सहायक अभियंता श्रेणी-१" या पदावरील दि.०१.०३.२०१२ ते दि.१९.०४.२०१७ या कालावधीतील वेतननिश्चितीबाबत वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वेतन-१२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दि.२३ मार्च, १९९४ व महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११(२)(ए) मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. श्री.कानडे, नगर रचनाकार यांची सहायक अभियंता श्रेणी-२ व सहायक अभियंता श्रेणी-१ पदावरील रजा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम २२(२) नुसार नवीन पदावरील रजेच्या हिशोबात जमा करण्यात यावी.

५. सदरचा शासन आदेश, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३७/२०२०/सेवा-३, दि.१२.०२.२०२० व अनौपचारिक संदर्भ क्र.५०/२०२०/सेवा-६, दि.१६.०९.२०२० अन्वये प्राप्त अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२०१००६११३०५१७४२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.10.06 14:43:11 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,** श्री.संग्राम लहु कानडे, नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-अ / राजपत्रित)
(द्वारा संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, पुणे)

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
६. उप सचिव (सेवा-३ / सेवा-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८. सहसंचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक.
९. नगर रचनाकार धुळे शाखा.
१०. प्रधान सचिव (नवि-१), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती / नवि-२७.

*****